**मुख्य अभियंता, ( विशेष प्रकल्प ) , जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयाच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि. ०१.१०.२०१६ ते दि.२८.२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०१६/ ( प्र.क्र. ५४६ /२०१६/ मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक ०१ डिसेंबर, २०१६

**पहावे**- १) शासन निर्णय क्र.जलसंपदा विभाग, क्रमांक- मुदतवाढ -२०१५/ प्र.क्र. ६३१/ २०१५/ मोप्र- २ दि. २८ /०१/२०१६, शासन शुध्दीपत्रक दिनांक २६ एप्रिल, २०१६

२) मुख्य अभियंता (वि.प्र) जलसंपदा विभाग, अमरावती यांचे जा.क्र.जसवि/विप्र/आ-२/ मुदतवाढ प्रस्ताव/ ३५८५/२०१६, दि. ३० ऑगस्ट, २०१६

३) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा १, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६

**प्रस्तावना**

मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प), जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील आकृतीबंधानुसार मंजूर ३० नियत अस्थायी आस्थापनेवरील पदापैकी २७ नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना ०१/०३/२०१६ ते दिनांक ३०/९/२०१६ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही , अशा अस्तित्वात सर्व अस्थायी पदांना ३० सप्टेंबर, २०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले होते. तथापी सर्व प्रशासकीय विभागांची सुधारीत आकृतिबंध निश्चित करण्याबाबतची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नाही. ही बाब विचारात घेऊन आता दिनांक २८/२/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार संदर्भ क्रमांक ३ चे शासन निर्णयानुसार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता,(विशेष प्रकल्प ) जलसंपदा विभाग, अमरावती यांचे संदर्भ क्र. २ पत्राअन्वये प्रस्तावित केल्यानुसार आता मुख्य अभियंता ( विशेष प्रकल्प ) जलसंपदा विभाग, अमरावती या कार्यालयातील मंजूर ३० नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांपैकी उपलब्ध करुन दिलेल्या २७ नियत

अस्थायी आस्थापनेवरील पदांना सोबतच्या परिशिष्ट अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक १/१०.२०१६ ते दि.२८/२/२०१७ पर्यंत मुदतवाढ खालील अटींचे अधिन राहून देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

३) उपरोक्त कार्यालयातील खर्च, मागणी क्रमांक आय-५ (नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष- ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०) सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०४) योजनेतर वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान, (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४७०१ आय १७-१) या लेखाशीर्षाखाली महामंडळास मंजूर असलेल्या नियत अस्थाई आस्थापनेच्या वेतनाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४) हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा १, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ नुसार विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय , महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१६१२०११६२०२५५९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सहपत्र- परिशिष्ट 'अ'

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Smita Sachin Rane
Date: 2016.12.01 16:23:53 +05'30'

**( स्मि.स.राणे )**
शासनाचे कार्यासन अधिकारी

**प्रत- सहपत्रासह-**

३) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, ( लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर,
४) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखापरीक्षा ) नागपूर,
५) वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,
६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर
७) मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प जलसंपदा विभाग, अमरावती यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी /कर्मचा-यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीच्या प्रत्यक्ष/अप्रत्यक्षरित्या चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांवर राहील, याची कृपया नोंद घ्यावी.
८) कार्यासन मोप्र-(२), संग्रहार्थ.

## परिशिष्ट अ

**शासन निर्णय क्र. २०१६/ ( प्र.क्र. ५४६ /२०१६/ मोप्र-(२) , दिनांक १/ १२/२०१६ चे सहपत्रनियत अस्थायी आस्थापनेवरील खालील नमूद २७ पदांना दिनांक ०१.१०.२०१६ ते २८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ**

| अ.क्र. | पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | फिरवाफिरविने प्रत्यक्षात मुदतवाढीसाठी प्रस्तावित उपलब्ध करून दिलेली पदे |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | क.अ.-स.अ.श्रे.-२-शा.अ. | ३ | ३ |
| ५ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ६ | विशेष अधीक्षक | १ | ० |
| ७ | अधीक्षक | १ | ० |
| ८ | मुख्य दफतर कारकून | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघुलेखक (उच्चश्रेणी/ निम्नश्रेणी) | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनीचालक | १ | ० |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दफतरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **२७** |
| **एकूण मुदतवाढीची पदे - २७** | | | |